GR-20040729175131001- 1100.

केंद्र शासनाचा विद्युत अधिनियम, २००३ चे कलम
१६६(४) नुसार राज्यातील वीज प्रणाली सुरळीत व
समन्वयाने विकसित होण्यासाठी समन्वय
चर्चापीठाची स्थापना -

**महाराष्ट्र शासन**

उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग,

शासन निर्णय क्रमांक इसीए-२००३/प्र.क्र.८६२२/ऊर्जा-५

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

दिनांकः- २७/५/०४

**प्रस्तावनाः-**

केंद्र शासनाचा विद्युत अधिनियम,२००३ चे कलम १६६(४) नुसार राज्यातील वीज प्रणाली सुरळीत व समन्वयाने विकसित होण्यासाठी समन्वय चर्चापीठाची स्थापना करणे प्रस्तावित आहे. सदर अधिनियमातील तरतूदीनुसार चर्चापीठाची प्रस्तावित संरचना खालील प्रमाणे असणे आवश्यक आहे..

| | |
|---|---|
| १) महाराष्ट्र विद्युत नियामक आयोगाचे अध्यक्ष - | अध्यक्ष |
| २) महाराष्ट्र विद्युत नियामक आयोगाचे दोन्ही सदस्य - | सदस्य |
| ३) राज्यातील वीज निर्मिती, पारेषण व वितरण - यामध्ये सहभागी असलेल्या वीज निर्मिती कंपनी पारेषण परवानाधारक व वितरण परवानाधारक यांचे प्रतिनिधी. | सदस्य |

याअनुषंगाने महाराष्ट्र विद्युत नियामक आयोग, राज्यातील वीज निर्मिती, पारेषण व वितरण यामध्ये सहभागी असलेल्या वीज निर्मिती कंपन्यांकडून तसेच संबंधितांना आपल्या प्रतिनिधींची नांवे कळविण्याची विनंती करण्यात आली. उपरोक्त विनंतीस अनुसरुन राज्यातील वीज निर्मिती, पारेषण व वितरण परवानाधारक कंपन्यांनी त्यांचे प्रतिनिधींबाबत राज्य शासनास कळविले आहे.

**शासन निर्णयः**-विद्युत अधिनियम, २००३ च्या कलम १६६(४) नुसार राज्यातील वीज प्रणाली सुरळीत व समन्वयाने विकसित होण्यासाठी समन्वय चर्चापीठाची संरचना खालील प्रमाणे करण्यात येत आहे.

| | |
|---|---|
| १) अध्यक्ष, महाराष्ट्र विद्युत नियामक आयोग, मुंबई | अध्यक्ष |
| २) सदस्य (एक) महाराष्ट्र विद्युत नियामक आयोग,मुंबई | सदस्य |
| ३) सदस्य (दोन) महाराष्ट्र विद्युत नियामक आयोग,मुंबई | सदस्य |
| ४) सचिव (ऊर्जा) उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ००३२ | आमंत्रक |

५) श्री.एस.एस.क्षत्रिय, महाव्यवस्थापक, — सदस्य
बृहन्मुंबई विद्युत पुरवठा व परिवहन उपक्रम,
मुंबई-४०० ००२.

६) श्री.फिरोज वांदेवाला,व्यवस्थापकीय संचालक, — सदस्य
टाटा पॉवर कंपनी.
मुंबई-४०० ००९.

७) श्री.सतीश शेठ, उपाध्यक्ष , — सदस्य
बीएसईएस (रिलायन्स एनर्जी लिमिटेड)
मुंबई-४०० ०५५.

८) श्री.रमेश वासुदेव कुळकर्णी — सदस्य
कार्यकारी संचालक,
दि.मूळा प्रवरा इले.को.ऑ.सोसायटी लि.,
श्रीरामपूर, जिल्हा अहमदनगर. ४१३७०९.

९) मुख्य अभियंता (ज.सं.) व सह सचिव — सदस्य
पाटबंधारे विभाग, मंत्रालय,
मुंबई -४०० ०३२.

१०) श्री.रामचंद्र, संचालक, — सदस्य
विंध्यांचल हायड्रो पॉवर लिमिटेड,
मुंबई-४०० ००१.

११) श्री चेतन मेहरा, — सदस्य
व्यवस्थापकीय संचालक,
वार्डझमन लि.
मुंबई-४०० ०५३.

१२) श्री.एम.आर.अंभोरे, — सदस्य
तांत्रिक सदस्य (निर्मिती)
म.रा.वि.मंडळ, मुंबई-४०० ०५१.

**समितीची कार्यकक्षा**

१) सदर समितीने राज्यातून वीज प्रणाली सुरळीत व समन्वयाने विकसित होण्यासाठी राज्यातील वीज निर्मिती, पारेषण व वितरण परवानाधारक यांचे प्रतिनिधींशी चर्चा करुन अहवाल शासनास सादर करावा

२) समितीने आपला अहवाल नियुक्तीपासून एक वर्षाच्या कालावधीत राज्य शासनास सादर करावा.

३) सदर समितीचा कालावधी नियुक्तीपासून एक वर्षासाठी राहिल.

४) समितीचे अध्यक्ष तसेच सदस्य यांना मानधन, प्रवासभत्ता अनुज्ञेय नाही.

५) समितीची बैठक महाराष्ट्र विद्युत नियामक आयोगाच्या कार्यालयात घेण्यात यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने

(प्र.बा.पाटील)
शासनाचे उपसचिव